राज्य शासकीय कर्मचारी गट विमा योजना,
१९८२ सुधारित करण्याबाबत.

महाराष्ट्र शासन

## वित्त विभाग

शासन निर्णय क्र. गवियो-१०९३/प्र. क्र. ६०/९३/हमी
दिनांक १७ फेब्रुवारी १९९४.

वाचा.–(१) शासन निर्णय, वित्त विभाग क्र. डीओआय-२०८१/४७०१/एडीएम-५, दिनांक २६ एप्रिल १९८२.
(२) शासन निर्णय, वित्त विभाग क्र. डीओआय-२०८१/सीआर-३३६/८२/एडीएम-५, दिनांक ९ फेब्रुवारी १९८३.
(३) शासन निर्णय, वित्त विभाग क्र. गवियो-११८३/प्र. क्र. ६६/८४/प्रशासन-५, दिनांक २८ फेब्रुवारी १९८६.

## शासन निर्णय

शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक डीओआय-२०८१/४७०१/८२/एडीएम-५, दिनांक २६ एप्रिल १९८२ च्या जोडपत्रासोबत जोडलेल्या योजनेचा परिच्छेद ७.१ खालीलप्रमाणे सुधारित करण्यात येत आहे :–

" ७.१. योजनेच्या प्रत्येक सदस्यास विम्याचे संरक्षण देण्यासाठी वर्गणीचा काही भाग राज्य शासनाच्या लोकलेख्यात ठेवावयाच्या विमा निधीमध्ये जमा करण्यात येईल. वर्गणी रु. १५ च्या प्रत्येक युनिटसाठी विम्याची संरक्षणाची रक्कम रु. १५,००० असेल. राज्य शासनाच्या सेवेत असताना कोणत्याही कारणाने जे " कर्मचारी " दुर्दैवाने मृत्यू पावतील, ज्यामध्ये आत्महत्त्येचा सुध्दा समावेश असेल, त्यांच्या कुटुंबाना ती रक्कम देण्यात येईल ".

२. शासन निर्णय, वित्त विभाग क्र. गवियो-११८३/प्र. क्र. ६६/८४/प्रशा-५, दिनांक २८ फेब्रुवारी १९८६ मधील परिच्छेद १(आठ) मधील वाक्याच्या सुरुवातीस " कुटुंबवान सदस्याने " असे शब्द घालण्यात यावेत.

३. शासन निर्णय, वित्त विभाग क्र. गवियो-११८३/प्र. क्र. ६६/८४/प्रशासन-५, दिनांक २८ फेब्रुवारी १९८६ च्या परिच्छेद ७ अन्वये विहित करण्यात आलेल्या " गवियो-नमुना क्र. अकरा " मध्ये निर्गमित केलेल्या लाभ प्रदानाच्या मंजुरी आदेशाची प्रत यापुढे वित्त विभागास पाठविण्यात येऊ नये.

४. गट विमा योजना, १९८२ मधील मूळ योजनेत दाखल करण्यात आलेल्या परिच्छेद ११.९ नंतर खालील नवीन परिच्छेद ११.१० ते ११.१३ या क्रमाने समाविष्ट करण्यात यावेत.–

" ११.१०. कार्यालय प्रमुख/विभाग प्रमुख सेवानिवृत्त झाला, सेवेत असताना मृत्यू पावला अथवा योजनेचे त्याचे सदस्यत्व संपुष्टात आले तर योजनेखालील मिळणाऱ्या रकमेच्या लाभ प्रदानाचे मंजुरी आदेश संबंधित विभाग प्रमुख व विभाग प्रमुखांच्या बाबतीत त्याचे प्रशासकीय विभाग काढतील ".

" ११.११. गट विमा योजनेचा सदस्य बेपत्ता असेल आणि त्याचा शोध लागला नाही तर त्याने नामनिर्देशित केलेल्या व्यक्तीस/वारसास विमा छत्राची रक्कम ती व्यक्ती ज्या महिन्यात बेपत्ता झाली त्यानंतरच्या महिन्यापासून सलग सात वर्षांचा कालावधी संपल्यानंतर देण्यात येईल. परंतु सदरील मागणीच्या पृष्ठर्थ दावेदारास संबंधित कर्मचारी मृत झाल्याबाबतचा योग्य आणि वादातीत असा पुरावा किंवा इंडियन एव्हिडन्स ॲक्टच्या कलम १०८ मधील तरतुदीनुसार तो मृत समजण्याबाबतचा न्यायालयाचा हुकुमनामा सादर करावा लागेल. तथापि, बचत निधीतील संचित रक्कम सदस्याने नामनिर्देशित केलेल्या व्यक्तीस/वारसास सदस्य बेपत्ता झाल्यापासूनच्या पुढच्या महिन्यानंतर एक वर्षाचा कालावधी समाप्त झाल्यावर पुढील अटींची पूर्तता केल्यावर देण्यात यावी,–

(एक) कुटुंबाला त्याबाबत संबंधित पोलीस स्टेशनमध्ये तक्रार नोंदवावी लागेल आणि पोलिसांनी सर्व ते प्रयत्न करूनही कर्मचाऱ्याचा तपास लागला नाही असा अहवाल पोलिसांकडून प्राप्त करून घ्यावा लागेल.

(शा.म.मु.) एच २७७७—(१५,०५०-३-९४)

(दोन) यदाकदाचित कर्मचारी स्वतः उपस्थित झाला आणि आपला दावा सादर करू लागला तर देण्यात आलेले सर्व प्रदान कर्मचाऱ्याला देय असलेल्या प्रदान रकमेशी समायोजित केले जाईल. या आशयाचे क्षतिपूर्ती बंधपत्र (Indemnity Bond) कर्मचाऱ्याच्या नामनिर्देशित व्यक्तीस/वारसास भरून द्यावे लागेल. ''

'' ११.१२. कर्मचारी बेपत्ता झाल्याच्या तारखेला त्याला जो वर्गणीचा दर लागू होता त्याच दराने बेपत्ता झाल्याच्या पुढील महिन्यापासून एक वर्षापर्यंत वर्गणीची पूर्ण रक्कम बेपत्ता कर्मचाऱ्याच्या नामनिर्देशित व्यक्ती/वारसाकडून वसूल करण्यात यावी. त्यानंतर रु. १५,००० च्या प्रत्येक विमा छत्रासाठी रु. ५ दरमहा प्रमाणे पुढील सहा वर्षे किंवा विमा छत्राची रक्कम प्रदान करण्यात येईल त्या महिन्यापर्यंत, यापैकी जे नंतर घडेल तोपर्यंत, विमा हप्ता वसूल करण्यात येईल. तथापि, एक वर्षाची पूर्ण वर्गणीची रक्कम आणि बचत निधीतील संचित रकमेवर अनुज्ञेय दराने व्याजाची वसुली, एक वर्षानंतर बचत निधीतील संचित रक्कम नामनिर्देशित व्यक्तिस/वारसास देताना करणे अनुज्ञेय राहील. तसेच रु. १५,००० च्या प्रत्येक विमा छत्रासाठी रु. ५ दरमहा या दराने पुढील सहा वर्षांसाठी विमा हप्ता आणि त्यावर बचत निधीतील संचित रकमेवर अनुज्ञेय असलेल्या दराने व्याजाची वसुलीसुद्धा सदस्याच्या बेपत्ता होण्याच्या पुढील महिन्यापासून सात वर्षांचा कालावधी समाप्त झाल्यानंतर प्रदान करण्यात येणाऱ्या विमा छत्राच्या रकमेतून करणे अनुज्ञेय राहील ''.

'' ११.१३. बेपत्ता कर्मचाऱ्यांच्या नियत सेवावधीचा दिनांक त्यांच्या बेपत्ता होण्यानंतरच्या पुढील महिन्यापासून सात वर्षांच्या कालमर्यादेपूर्वी येत असला तरीही बेपत्ता सदस्याच्या नामनिर्देशित व्यक्ती/वारसांना विम्याची रक्कम परिच्छेद ११.११ मध्ये दिलेल्या अटींची पूर्तता करण्याच्या अधिन राहून प्रदान करण्यात येईल. ''

५. शासन निर्णय, वित्त विभाग क्र. डीओआय-२०८१/सीआर-३३६/८२/एडीएम-५, दि. १ फेब्रुवारी १९८३ अन्वये दाखल केलेल्या नवीन परिच्छेद १९.१०(ब) मध्ये खालीलप्रमाणे सुधारणा करण्यात येत आहे :–

'' १९.१० (ब) जर एखाद्या सदस्याने नामनिर्देशित पत्र दिले नसेल किंवा त्याने दिलेले नामनिर्देशन पत्र संपूर्णतः किंवा अंशतः अग्राह्य असेल तर विमा योजनेनुसार देय होणारी रक्कम सदस्यांच्या मृत्यूनंतर पुढील व्यक्तींना खालील क्रमवारीने प्रदेय होईल–

(१) पुरुष सदस्याचे बाबतीत एक वा अनेक पत्नी, यामध्ये न्यायिक फारकत घेतलेल्या एक वा अनेक पत्नी यांचाही समावेश होतो (एकच असल्यास १०० टक्के व एकापेक्षा जास्त असल्यास समभाग).

(२) महिला सदस्यांचे बाबतीत पती, यामध्ये न्यायिक फारकत घेतलेल्या पतीचाही समावेश होतो (एकच असल्यास १०० टक्के व एकापेक्षा जास्त असल्यास समभाग).

वर (१) किंवा (२) मध्ये नमूद केलेला कोणताही सदस्य हयात नसेल त्या बाबतीत.

(३) मुलगे, यात सावत्र मुलगे आणि दत्तक मुलगे यांचाही समावेश होतो. आणि

(४) अविवाहीत मुली, यात सावत्र मुली आणि दत्तक मुली यांचाही समावेश होतो.

वर (१), (२), (३) व (४) मध्ये ज्यांचा उल्लेख करण्यात आला आहे, असा त्यांच्या कुटुंबाचा कोणीही सदस्य हयात नसेल त्या बाबतीत या योजनेखाली लाभाच्या रकमा त्या कुटुंबातील खाली नमूद केलेल्या एका किंवा अधिक हयात सदस्यांना समभागात प्रदेय होतील.

(५) विधवा मुली–यात सावत्र मुली आणि दत्तक मुली यांचाही समावेश होतो.

(६) वडील } ज्यांना व्यक्तीगत कायद्यानुसार दत्तक विधानास परवानगी असेल, अशा सदस्यांच्या बाबतीत दत्तक
(७) आई } आई-वडिल.

(८) अठरा वर्षे वयाखालील भाऊ, यात सावत्र भावाचाही समावेश होतो.

(९) अविवाहीत बहिणी आणि विधवा बहिणी यात सावत्र बहिणींचाही समावेश होतो.

(१०) विवाहित मुली. आणि

(११) पूर्वी मृत्यू पावलेल्या मुलींची अपत्ये.

वर (१), (२), (३), (४), (५), (६), (७), (८), (९), (१०) व (११) मध्ये नमूद केलेल्या कुटुंबातील सदस्यांपैकी कोणताही सदस्य नसेल अशा प्रसंगी अशा शासकीय कर्मचाऱ्यास संबंधित योजनेत प्रदेय होणारी विमा छत्राची

रक्कम आणि/किंवा बचत निधीमधील संचित रक्कम शासनाला व्यपगत होईल. मात्र ज्या व्यक्तिस न्यायालयाकडून उत्तराधिकार प्रमाणपत्र मंजूर करण्यात आलेले आहे, अशा व्यक्तिस विमा छत्राची रक्कम आणि/किंवा बचत निधीमधील संचित रक्कम प्रदेय राहील. "

६. या शासन निर्णयान्वये केलेल्या सुधारणा १ मे १९८२ पासून भूतलक्षी प्रभावाने अमलात येतील. तथापि, सदर आदेश निर्गमित होण्यापूर्वी ज्या प्रकरणांमध्ये रकमांचे प्रदान करण्यात आले असेल किंवा अंतिम निर्णय घेण्यात आला असेल, अशा प्रकरणांचा पुन्हा नव्याने विचार करण्यात येऊ नये.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

**म. बु. चंदन,**
शासनाचे उप सचिव.

प्रति,

सर्व विभागीय प्रमुख,
राज्यपालांचे सचिव,
मुख्यमंत्र्यांचे सचिव,
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) एक, महाराष्ट्र, मुंबई,
महालेखापाल (लेखा परिक्षा) एक, महाराष्ट्र, मुंबई,
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) दोन, महाराष्ट्र, नागपूर,
महालेखापाल (लेखा परिक्षा) दोन, महाराष्ट्र, नागपूर,
मंत्रालयातील सर्व मंत्रालयीन विभाग,
सर्व विभाग प्रमुख/कार्यालय प्रमुख,
सर्व कोषागार अधिकारी,
सर्व उप कोषागार अधिकारी,
*प्रबंधक, मूळ न्याय शाखा, उच्च न्यायालय, मुंबई,
*प्रबंधक, अपिल शाखा, उच्च न्यायालय, मुंबई,
*सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधान भवन, मुंबई,
*सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
*प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय,
संचालक, लेखा व कोषागारे, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
उप संचालक, लेखा व कोषागारे, नागपूर,
उप संचालक, लेखा व कोषागारे, पुणे,
मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, नवी मुंबई,
उप मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा,
मुंबई/पुणे/नागपूर/औरंगाबाद/नाशिक/अमरावती,
सर्व मंत्री, राज्यमंत्री आणि उपमंत्री यांचे स्वीय सहाय्यक,
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
निवासी लेखा अधिकारी, मुंबई,
विमा संचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
वित्त विभागातील सर्व कार्यासने.

*पत्राने